**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत पशुरोगांचे RTPCR चाचणीव्दारे निदान करण्यासाठी राज्यातील ४ विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे बळकटीकरण व ३ विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे अंशत: बळकटीकरण करणे या प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. राकृवि-२०२१/प्र.क्र.१४०/पदुम-४,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२
दिनांक :- ०१ डिसेंबर, २०२१

<u>वाचा</u> : १. राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांचे पत्र क्र.आरकेव्ही-०२२१/प्र.क्र.२५/१४-ए, दि. ४.०३.२०२१ अन्वये दि.१० मे, २०२१ रोजी पार पडलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या सभेचे निर्गमित केलेले इतिवृत्त.

२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.एफवायपी-२१ (२२)/ सीआर-३४/ २२२२/आरकेव्हीवाय/२०१९, दि.१५.०९.२०२१.

३. अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे पत्र क्र.एफवायपी/२०२१-२२/आरकेव्हीवाय/सीआर-१३/पीएफएमएस/२७११/पसं-६, पुणे दि.११.११.२०२१.

**<u>प्रस्तावना:</u>**

राज्यातील पशुपालक, शेतकरी हे पशुसंवर्धनाशी निगडीत रोजगार व स्वयंरोजगार करीत आहेत. त्यांच्याकडे असलेल्या गायवर्ग / महिषवर्ग / मेंढया-शेळया / कुक्कुट व इतर पाळीव प्राणी यांच्यात उद्भवणाऱ्या घातक साथीच्या रोगांमुळे पशुधनामध्ये आजारपण येते अथवा मर्तुक होते व त्यामुळे उत्पादनावर विपरीत परिणाम होतो. फऱ्या, घटसर्प, पीपीआर, लाळ-खुरकुत आणि कुक्कुट पक्षातील बर्ड फ्लू व राणीखेत इत्यादी रोगांच्या निदानासाठी रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे या राज्यस्तरीय रोग निदान संस्थेकडे रोग नमूने सादर करावे लागतात. यामुळे रोग निदान कार्यात वेळेचा अपव्यय होतो आणि पर्यायाने पशुधनातील मर्तुक आटोक्यात ठेवण्यास विलंब होऊन पशुपालकांचे आर्थिक नुकसान होते. राज्यात पशुरोगांच्या निदानासाठी पुणे, औरंगाबाद, नाशिक, चिपळूण, अकोला, नागपूर आणि कोल्हापूर या ०७ ठिकाणी विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळा कार्यरत आहेत. पशुपालकांचे आर्थिक नुकसान टाळण्यासाठी सध्यस्थितीत अद्ययावत व प्रचलित झालेले आरटीपीसीआर (RTPCR) हे तंत्रज्ञान व त्यासाठी लागणारी सयंत्रे हे विभागिय स्तरावरील पशुरोग निदान प्रयोगशाळांना पुरवून त्यांचे बळकटीकरण करणे आवश्यक आहे. यास्तव, पशुधन व कुक्कुट पक्षांमधील यामधील घातक साथ रोगांचे अचूक व कमी वेळेत निदान करून साथ रोग आटोक्यात आणण्यास क्षेत्रिय पशुवैद्यकीय संस्थांना मदत करणे आणि पशुपालक व कुक्कुट पालकांचे आर्थिक नुकसान टाळणे यासाठी दि. १० मे, २०२१ रोजी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या पार पडलेल्या २९ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या सभेमध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत **पशुरोगांचे RTPCR चाचणीव्दारे निदान करण्यासाठी राज्यातील नाशिक, अकोला, कोल्हापूर आणि चिपळूण या ०४ विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे बळकटीकरण व पुणे,**

**औरंगाबाद आणि नागपूर या ०३ विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे अंशत: बळकटीकरण करणे** या प्रकल्पास समितीने मंजुरी प्रदान केलेली आहे. सदरच्या प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्याच्या अनुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत पशुरोगांचे RTPCR **चाचणीव्दारे** निदान करण्यासाठी राज्यातील नाशिक, अकोला, कोल्हापूर आणि चिपळूण ०४ या विभागिय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे बळकटीकरण व पुणे, औरंगाबाद आणि नागपूर या ०३ विभागिय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे अंशत: बळकटीकरण करणे हा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मंजूरी तसेच, प्रकल्पासाठी येणारा खर्च रू. २.५० कोटी यास वित्तिय मान्यता प्रदान करण्यात येते आहे.

सदरचा प्रकल्प राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत प्रत्यक्ष निधी उपलब्धतेच्या अधिन राहून सन २०२१-२२ ते २०२२-२३ या कालावधीत राबविण्यात यावा.

**प्रकल्पाची उद्दिष्टे :-**

१. पशुरोगांचे RT-PCR **चाचणीव्दारे** निदान करण्यासाठी महाराष्ट्र राज्यातील सर्व विभागिय रोग निदान प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे.
२. राज्यातील आर्थिकदृष्ट्या महत्वाच्या आणि झुनोटिक (प्राण्यांपासून मानवास होणारे रोग प्रादुर्भाव) रोगांचे सर्वेक्षण व नियंत्रण करणे
३. RT-PCR सारख्या आधूनिक निदान तंत्रज्ञानाचा वापर प्रमाणित (Standardize) करुन राज्यातील आर्थिकदृष्ट्या महत्वाच्या आणि झुनोटिक रोगांचे जलद आणि अचूक निदान करणे.
४. पशुधन व कुक्कुट यामधील घातक रोग आटोक्यात आणण्यास क्षेत्रिय पशुवैद्यकीय संस्थांना मदत करणे आणि पशुपालक व कुक्कुट पालकांचे आर्थिक नुकसान टाळणे.

प्रकल्पा अंतर्गत प्रयोगशाळेच्या आधुनिकीकरणासाठी खर्चाच्या बाबी खालीलप्रमाणे आहेत.

**(रु. लाखात)**

| अ. क्र. | बाब | एका प्रयोगशाळेसाठी आवश्यक संख्या | सर्व प्रयोगशाळांसाठी आवश्यक संख्या | प्रति यंत्रसामुग्री अंदाजे किंमत | अंदाजे एकूण किंमत |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Real Time PCR Machine with UPS, Laptop and Laser Printer | 1 | 4 | 15.00 | 60.00 |
| 2 | PCR Work Station | 2 | 8 | 3.00 | 24.00 |
| 3 | My spin 12 Mini centrifuge / Tab spin micro centrifuge | 4 | 8 | 0.10 | 0.80 |
| 4 | Vertical Ultra Deep Freezer-80 Deg.cel | 4 | 4 | 5.25 | 21.00 |
| 5 | Bio safety Cabinet Class II type A2 | 7 | 7 | 5.30 | 37.10 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 6 | Virtex mixe, 2000 RPM | 7 | 7 | 0.105 | 0.735 |
| 7 | Refregertor Double Door (400 lit) | 7 | 7 | 1.00 | 7.00 |
| 8 | Deep Freezer-20 Deg.cel Horizontal | 7 | 7 | 1.50 | 10.50 |
| 9 | Autoclave Table Top Small | 7 | 7 | 1.575 | 11.025 |
| 10 | Microwave Oven | 7 | 7 | 0.315 | 2.205 |
| 11 | Dry Bath / Heating Block | 7 | 7 | 1.05 | 7.35 |
| 12 | Digital Laboratory Weighing Balance | 7 | 7 | 1.00 | 7.00 |
| 13 | Submarine horizontal Mini Electrophoresis Unit with power Supply and gel cast | 7 | 7 | 1.575 | 11.025 |
| 14 | Air Conditioners | 7 | 7 | 0.50 | 3.50 |
| 15 | U.V.Light Gel Viewing Cabinet | 7 | 7 | 0.2544 | 1.7808 |
| 16 | Single channel pipette set (one set of 5 pipettes) | 7 | 7 | 0.84 | 5.88 |
| 17 | Multi Chanel Pipette Set (one set of 2 pipettes) | 7 | 7 | 1.00 | 7.00 |
| 18 | RT-PCR Kits and Chemicals | For 7 RDILs | 7 | 3.00 | 21.00 |
| 19 | Consumables, Glassware & Plastic wares | For 7 RDILs | 7 | 1.585 | 1.10 |
| | **Total Cost** | **--** | **--** | **--** | **250.00** |

१. मंजूर प्रकल्पाची यशस्वीरित्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी सहआयुक्त पशुसंवर्धन, भारतरत्न अटलबिहारी वायपेयी राष्ट्रीय रोग अन्वेषण विभाग, पुणे यांची राहील. तसेच, सदर प्रकल्पाचे राज्य स्तरावर संनियंत्रण आयुक्त पशुसंवर्धन हे करतील.

२. मंजुर करण्यात आलेला निधी हा प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात (DPR) मध्ये समाविष्ट मंजूर घटकांकरिताच खर्च करण्यात यावा.

३. मंजूर करण्यात आलेल्या निधीबाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे जी.एफ.आर. नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पद्धतीप्रमाणे ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरीक्षण यासंबंधीची माहिती आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांना सादर करण्यात यावी.

४. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी राष्ट्रीय कृषि विकास योजना, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, पशुसंवर्धन आणि वित्त विभागाच्या स्तरावरून वेळोवेळी खरेदी विषयक निर्गमित झालेले शासन निर्णय / परिपत्रके व अनुषंगिक तरतुदींच्या अधिन राहुन करण्यात यावी.

५. उपलब्ध करून दिलेल्या निधीचे विहीत प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी शासनास सादर करावे. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त न झाल्यास उर्वरित निधी वितरित केला जाणार नाही. तसेच, वितरीत निधी विहित कालावधीत खर्च न केल्यास प्रकल्प कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल.

६. हा प्रकल्प राबवून झाल्यानंतर आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी प्रकल्पाचा फलनिष्पत्ती अहवाल त्यांच्या स्वयंस्पष्ट अभिप्रायांसह शासनास सादर करावा.

७. सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि. १० मे, २०२१ रोजी च्या बैठकीतील निर्णय, राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यात यावा.

८. या प्रकल्पाचा समावेश संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा कृषि आराखड्यात (C-DAP) करण्यात येऊन तसे राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांना तसेच, या विभागास कळविण्यात यावे.

९. केंद्र शासनाने विकसित केलेल्या आरडीएमआयएस / RDMIS प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी व उपकरणांचे Geo-tagging करण्यात यावे. तसेच, प्रकल्पाचा आर्थिक खर्चाचा व भौतिक साध्याचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे आयुक्त कृषी, पुणे तसेच, शासनास सादर करावा.

१०. प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

११. सदर प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रिय कार्यालयांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२७१७०८३०१८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2021.12.27 17:10:06 +05'30'

**( डॉ. संजय वि. डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
५. सचिव (कृषि ) कृषि व पदुम विभाग मंत्रालय,मुंबई-३२
६. अपर मुख्य सचिव, नियोजन व विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
७. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२

८. आयुक्त पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे
९. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. जिल्हाधिकारी (सर्व)
११. उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षण), मुंबई / नागपूर.
१३. सहआयुक्त पशुसंवर्धन, भारतरत्न अटलबिहारी वाजपेयी राज्यस्तरीय रोग अन्वेषण विभाग, पुणे
१४. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
१५. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (सर्व)
१६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, विभागिय रोग अन्वेषण प्रयोगशाळा (सर्व)
१८. अवर सचिव, पदुम-३, कक्ष अधिकारी पदुम-१, २, १६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई.
१९. निवड नस्ती पदुम-४.